## महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक, क्रमांक : ममाअ-२००२/प्र.क्र.१२७/०२/५,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १४ ऑगस्ट,२००३

पहा :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, क्र.: ममाअ-२००२/ प्र.क्र.९६/०२/५, दि. ३०/९/२००२.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, क्र.: ममाअ-२००२/ प्र.क्र.१३२/०२/५, दि. ७/१/२००३.

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.: ममाअ-२००३/ प्र.क्र.५२/०३/५, दि.३१/७/२००३.

४) प्रधान सचिव व विशेष चौकशी अधिकारी (१), सामान्य प्रशासन विभाग यांचे मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांच्या सचिव/ प्रधान सचिव/अपर मुख्य सचिवांना उद्देशून पाठविलेले अ.शा.पत्र क्र.: ममाअ-२००३/२०६/प्र.क्र.१३/०३/५, दि.७ जुलै, २००३.

**शासन परिपत्रक :-**

शासकीय व्यवहारांची / कामकाजाची जास्तीत जास्त माहिती जनतेस मिळावी या करिता दि.२३ सप्टेंबर, २००२ पासून अंमलात आलेल्या "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२ " च्या अनुषंगाने करावयाच्या कार्यवाहीची सविस्तर कार्यपद्धती उपरोक्त दि.३० सप्टेंबर, २००२ व दि.७ जानेवारी, २००३ च्या शासन परिपत्रकान्वये सर्व संबंधितांना कळविण्यात आली आहे.

२. दिनांक २३ सप्टेंबर, २००२ रोजी प्रख्यापित केलेला "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२" हा अध्यादेश त्याचे विहित मुदतीत अधिनियमात रुपांतर होऊ शकले नसल्याने व्यपगत झाला.

३. या अध्यादेशाचे अधिनियमात रुपांतर करण्याबाबतचे प्रलंबित असलेले "महाराष्ट्र माहितीचा अधिकार विधेयक, २००२" हे विधेयक सन २००३ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात विधीमंडळाच्या दोन्ही सभागृहात मांडण्यात आले होते व ते मंजूरही झाले होते. परंतु त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी सुरु होण्यापूर्वी त्यास मा.राष्ट्रपतीची मंजुरी घेणे आवश्यक होते. त्याबाबतची आवश्यक ती कार्यवाही आता पूर्ण होऊन राज्य शासनाच्या विधेयकास मा.राष्ट्रपतींची मंजुरी मिळाली आहे. त्यामुळे या विधेयकाचे अधिनियमात

रुपांतर होऊन "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२" दि.२३/०९/२००२ पासून पूर्वलक्षी प्रभावाने अंमलात आलेला आहे. या अधिनियमाची मराठी व इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे. या अधिनियमातील कलम २१ (१) अनुसार "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२" हा निरसित करण्यात आला आहे. तसेच या अध्यादेशान्वये करण्यात आलेली कोणतीही गोष्ट किंवा कार्यवाही ही (काढण्यात आलेली कोणतीही अधिसूचना किंवा आदेश यांसह) सदर अधिनियमांन्वये करण्यात आलेली गोष्ट, कार्यवाही किंवा यथास्थिती, काढण्यात आलेली अधिसूचना किंवा आदेश असल्याचे मानण्यात येईल अशी तरतूद कलम २१ (२) अनुसार करण्यात आली असल्याने हा अधिनियम पूर्वलक्षी प्रभावाने दि.२३ सप्टेंबर, २००२ पासून लागू झाला आहे.

४. "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२" च्या अनुषंगाने तयार करण्यात आलेले नियम यापूर्वीच उपरोल्लेखित दि.३०.९.२००२ च्या शासन परिपत्रकासोबत सर्व संबंधितांना पाठविण्यात आलेले आहेत. अधिनियमाच्या कलम २१(२) अन्वये सदरचे नियम संरक्षित करण्यात आले असल्याने ते नियम आता अधिनियमातील तरतुदीनुसार करण्यात आले असल्याचे समजण्यात यावेत व त्याची अंमलबजावणीदेखील पूर्वलक्षी प्रभावाने करण्यात यावी.

५. शासकीय माहिती अधिकारी, अपीलीय अधिकारी यांच्या नेमणूका करण्याच्या सूचना तसेच कार्यालयातील अभिलेख तालिकाबध्द व निर्देशसूचीबध्द करण्याच्या सूचना उपरोल्लेखित दि.३०.९.२००२ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या होत्या. त्यानुसार सर्व संबंधितांकडून याबाबतची आवश्यक ती कार्यवाही पूर्ण झाली असेल अशी अपेक्षा आहे. अशी कार्यवाही पूर्ण झाली नसल्यास आवश्यक कार्यवाही आता १५ दिवसांचे आत पूर्ण करण्यात यावी. हा अधिनियम पूर्वलक्षी प्रभावाने म्हणजेच दि.२३ सप्टेंबर, २००२ पासून लागु करण्यात आला असल्याने दरम्यानच्या कालावधीमध्ये माहितीची मागणी करणारे जे अर्ज प्रलंबित / अनिर्णित राहिले असतील त्या अर्जांवर कार्यवाही करणे आवश्यक ठरेल. मात्र कोणतीही दंडात्मक कारवाई पूर्वलक्षी प्रभावाने करता येत नसल्याने या अधिनियमातील/नियमातील दंडात्मक तरतुदी या अधिनियमाच्या तारखेपासूनच लागु होतील.

६. दरम्यानच्या कालावधीत माहितीच्या अधिकारासंदर्भात राज्यात कोणताही कायदा अस्तित्वात नसल्याने व जनतेला माहिती उपलब्ध करुन देण्याची शासनाची भूमिका असल्याने जनतेस माहिती उपलब्ध करुन देण्याकरिता उपरोल्लेखित क्र.३ येथील दि.३१ जुलै, २००३ च्या शासन निर्णयान्वये सर्व संबंधितांना प्रशासकीय आदेश देण्यात आले होते. आता "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम,२००२" अंमलात आला असल्याने उपरोक्त नमूद क्र.३ मधील दि.३१ जुलै, २००३ चा शासन निर्णय रद्द समजण्यात यावा.

७. या ठिकाणी असेही नमूद करण्यात येते की, केंद्र शासनाचा "माहिती स्वातंत्र्याचा अधिनियम, २००२" (सन २००३ चा क्र.५) हा दि.६ जानेवारी, २००३ रोजी प्रसिध्द झालेला

H-718 (4500-8-03)

आहे. त्याच्या प्रती उपरोल्लेखित अ.क्र.४ येथील अ.शा.पत्राद्वारे सर्व प्रशासकीय विभागांकडे त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे आवश्यक त्या कार्यवाहीसाठी पाठविण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार सदर कार्यवाही स्वतंत्रपणे करणे आवश्यक असल्याने ती चालू ठेवावी.तथापि,केंद्र शासनाचा अधिनियम अंमलात आलेला नसल्याने माहिती देण्यासंदर्भातील कार्यवाही राज्य शासनाच्या वर नमूद केलेल्या अधिनियमानुसार करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ज.व. दिवाण)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
* ७) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* ८) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* ९) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* १०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* ११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* १२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
* १३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) सर्व मंत्रालयीन विभाग,
१७) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१८) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१९) निवड नस्ती.

* (पत्राने)

—x—

H-718(4500-8-03)2

असा. क्र. ४०

रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५




# महाराष्ट्र शासन राजपत्र

**असाधारण**

**प्राधिकृत प्रकाशन**

**सोमवार, ऑगस्ट ११, २००३/श्रावण २०, शके १९२५**

**स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.**

# भाग चार

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम**

**अनुक्रमणिका**



दिनांक १० ऑगस्ट २००३ रोजी मा. राष्ट्रपतींनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**प्रतिमा उमरजी,**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.
विधी व न्याय विभाग.

## सन २००३ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३१.

(मा. राष्ट्रपतींची संमती मिळाल्यानंतर “ **महाराष्ट्र शासन राजपत्रात** ” दिनांक ११ ऑगस्ट २००३ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

## महाराष्ट्र राज्यात माहितीचा अधिकार परिणामकारक रीतीने प्राप्त करण्यासाठी व त्याची अंमलबजावणी करण्यासाठी आणि तत्संबंधी व तद्नुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम.

**ज्याअर्थी,** भारताचे संविधान याच्या अनुच्छेद १९(१) अन्वये नागरिकांना दिलेल्या मूलभूत अधिकारांचा एक भाग म्हणून सर्वोच्च न्यायालयाने माहितीच्या अधिकारास मान्यता दिलेली आहे ;

**आणि ज्याअर्थी,** माहितीचा अधिकार हा लोकशाहीचा पाया असून त्यामुळे राज्याच्या राजकारभारात पारदर्शकता, खुलेपणा व जबाबदारीची जाणीव आणणे सुलभ होईल आणि लोकशाही समाजव्यवस्थेमध्ये जनतेच्या प्रभावी सहभागाची सुनिश्चिती होईल ;

**आणि ज्याअर्थी,** महाराष्ट्र राज्यात माहितीचा अधिकार परिणामकारक रीतीने प्राप्त करण्यासाठी व त्याची अंमलबजावणी करण्यासाठी आणि तत्सबंधी किंवा तदनुषंगिक बाबींसाठी तरतूद करणे इष्ट आहे ;

**आणि ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नव्हते ;

**आणि ज्याअर्थी,** श्री. चुनीलाल करसनदास ठक्कर, हे महाराष्ट्राचे राज्यपाल यांची कार्ये पार पाडताना, यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, कायदा करण्याकरिता, त्वरित कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे, अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली होती ; आणि, म्हणून त्यांनी दिनांक २३ सप्टेंबर २००२ रोजी, महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२ हा प्रख्यापित केला होता ; २००२ चा महा अध्या. १०.

**आणि ज्याअर्थी,** उक्त अध्यादेशाचे राज्य विधानमंडळाच्या अधिनियमात रूपांतर करणे इष्ट आहे ; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या त्रेपन्नाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

संक्षिप्त नाव, व्याप्ती व प्रारंभ. **१.** (१) या अधिनियमास, महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ असे म्हणावे.

(२) तो, संपूर्ण महाराष्ट्र राज्यास लागू असेल.

(३) तो, दिनांक २३ सप्टेंबर २००२ रोजी अंमलात आला असल्याचे मानण्यात येईल.

व्याख्या. **२.** या अधिनियमात, संदर्भानुसार अन्य अर्थ अपेक्षित नसेल तर,—

(१) " अपील प्राधिकरण " याचा अर्थ, खंड (३) मध्ये नमूद केलेला संबंधित सक्षम प्राधिकारी, असा आहे आणि या अधिनियमाच्या प्रयोजनार्थ, संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, अपील प्राधिकारी म्हणून कृती करण्यासाठी प्राधिकृत केलेल्या अशा अधिकाऱ्याचा किंवा अधिकाऱ्यांचादेखील त्यात समावेश असेल ;

(२) " समिती " याचा अर्थ, शासनाचे अपर मुख्य सचिव (गृह) हे अध्यक्षस्थानी असलेली आणि शासनाकडून विनिर्दिष्ट करण्यात आलेले अन्य दोन सदस्य असलेली, कलम ७ (क) च्या प्रयोजनांकरिता, या बाबतीत काढण्यात आलेल्या आदेशाद्वारे शासनाने घटित केलेली समिती, असा आहे ;

(३) " सक्षम प्राधिकारी " याचा अर्थ,—

(एक) राज्य शासनाच्या प्रत्येक प्रशासकीय विभागाचा प्रमुख ;

(दोन) राज्यातील शासकीय व इतर प्राधिकरणांचे प्रशासकीय प्रमुख ;

(तीन) महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० अन्वये नोंदणी झालेल्या सहकारी संस्थांकरिता, सहकारी संस्थांचे निबंधक ; १९६१ चा महा. २४.

(चार) सोसायटी नोंदणी अधिनियम, १८६० अन्वये नोंदणी झालेल्या सोसायट्यांकरिता सोसायटींचे निबंधक ; १८६० चा २१.

१९५० चा मुंबई २९.

(पाच) धर्मादाय आयुक्तांच्या कार्यालयाचे आणि मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० अन्वये नोंदणी करण्यात आलेल्या सार्वजनिक विश्वस्त व्यवस्थेकरिता धर्मादाय आयुक्त ;

(सहा) कामगार आयुक्ताकडे नोंदणी झालेल्या श्रमिक संघांकरिता कामगार आयुक्त ;

(सात) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या प्रशासकीय शाखेकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सचिव ;

(आठ) लोकायुक्त आणि उप लोकायुक्तांच्या कार्यालयाच्या प्रशासकीय शाखेकरिता लोकायुक्त आणि उप लोकआयुक्तांचे प्रबंधक,

असा आहे ;

(४) " शासन " याचा अर्थ, महाराष्ट्र शासन असा आहे ;

(५) " माहिती " याचा अर्थ, शासनाच्या आणि कोणत्याही शासकीय प्राधिकरणाच्या कारभारासंबंधातील कोणत्याही बाबीविषयीची माहिती, असा आहे आणि त्यात, दस्तऐवज, डिस्केट्स, फ्लॉफी किंवा अन्य कोणत्याही इलेक्ट्रॉनिक प्रकार यामधील कोणत्याही अभिलेखाच्या प्रतीचा समावेश होतो ;

(६) " शासकीय प्राधिकरण " याचा अर्थ, कोणत्याही केंद्रीय किंवा राज्य कायद्याद्वारे स्थापना केलेले किंवा घटित केलेले कोणतेही प्राधिकरण किंवा संस्था, असा आहे आणि त्यात, राज्याची मालकी असलेली व राज्याकडून नियंत्रित केलेली कोणतीही संस्था किंवा ज्या संस्थेला शासनाकडून प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे कोणतेही सहाय्य मिळते, अशी इतर कोणतीही संस्था यांचा समावेश होतो आणि त्यात, ज्या संस्थांची रचना व प्रशासन प्रामुख्याने शासनाकडून नियंत्रित केले जाते किंवा अशा ज्या संस्थेची कार्ये सार्वजनिक स्वरूपाची किंवा हिताची आहेत किंवा ज्या संस्थेचे पदाधिकारी शासनाने नियुक्त केलेले आहेत, अशा संस्थांचाही समावेश होईल.

**स्पष्टीकरण.**—या खंडाच्या प्रयोजनार्थ, " सहाय्य " या शब्दप्रयोगामध्ये, सवलतीच्या दराने शासकीय जमिनीच्या स्वरूपातील शासकीय सहाय्य किंवा शासनाकडून दिल्या जाणाऱ्या किंवा वेळोवेळी, विनिर्दिष्ट केल्या जाणाऱ्या, कर इत्यादीपासूनच्या सुट देण्यासारख्या इतर कोणत्याही आर्थिक सवलती, यांचा समावेश होईल ;

(७) " शासकीय माहिती अधिकारी " याचा अर्थ, कलम ५ च्या पोट-कलम (१) अन्वये कोणत्याही सक्षम प्राधिकाऱ्याने पदनिर्देशित केलेला अधिकारी, असा आहे आणि त्यात, या अधिनियमाखाली आपले कर्तव्य पार पाडण्यासाठी शासकीय माहिती अधिकाऱ्याकडून ज्याचे सहाय्य घेतले जाते अशा अधिकाऱ्याचा किंवा कर्मचाऱ्याचा समावेश असेल ;

(८) " विहित " याचा अर्थ, या अधिनियमान्वये करण्यात आलेल्या नियमांद्वारे विहित केलेले, असा आहे ;

(९) " अभिलेख " याचा अर्थ,—

(एक) कोणताही दस्तऐवज, हस्तलिखित किंवा फाईल ,

(दोन) दस्तऐवजाचा कोणताही सूक्ष्मपट (मायक्रोफिल्म), सूक्ष्म चित्रपट्टिका (मायक्रोफिच) आणि प्रतिरूप (फॅक्सिमिल) प्रत ,

(तीन) अशा सूक्ष्मपटामध्ये संनिविष्ट केलेल्या प्रतिमेची किंवा प्रतिमांची कोणतीही पुनर्निर्मिती (मग त्या परिवर्धित केलेल्या असोत वा नसोत) , आणि

(चार) संगणकाद्वारे किंवा अन्य कोणत्याही साधनाद्वारे निर्माण करण्यात आलेले इतर कोणतेही साहित्य,

असा आहे आणि त्यात या सर्वांचा समावेश होतो ;

(१०) " राज्य " याचा अर्थ, महाराष्ट्र राज्य, असा आहे.

माहितीचा अधिकार. ३. या अधिनियमाच्या तरतुदींना अधीन राहून प्रत्येक नागरिकाला माहिती मिळवण्याचा अधिकार असेल.

शासकीय प्राधिकरणावरील बंधने. ४. प्रत्येक सक्षम प्राधिकारी,—

(क) त्याच्या कामकाजाच्या आवश्यकतेनुसार सुसंगत अशा रीतीने आणि अशा नमुन्यात आपले सर्व अभिलेख रीतसर तालिकाबद्ध व निर्देश सूचीबद्ध करून ठेवील ;

(ख) विहित केलेल्या रीतीने वेळोवेळी,—

(एक) त्याच्या संघटनेचा, कार्याचा आणि कर्तव्यांचा तपशील ,

(दोन) त्याचे अधिकारी आणि कर्मचारी यांचे अधिकार व कर्तव्ये आणि निर्णय घेण्याच्या प्रक्रियेत त्यांनी अनुसरावयाची कार्यपद्धती,

(तीन) त्याची कर्तव्ये पार पाडण्यासाठी शासकीय प्राधिकरणाने ठरवून दिलेली प्रमाणके,

(चार) नागरिकांना उपलब्ध करून देता येतील असे नियम, विनियम, सूचना, नियमपुस्तिका, शासन निर्णय, आदेश व मार्गदर्शिका आणि कार्यालयात असलेल्या अभिलेखांची यादी,

(पाच) माहिती मिळवण्यासाठी नागरिकांना उपलब्ध असलेल्या सुविधांचा तपशील,

(सहा) शासकीय माहिती अधिकाऱ्याचे नाव, पदनाम आणि इतर तपशील, आणि

(सात) संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याकडून वेळोवेळी विहित करण्यात येईल अशी अतिरिक्त माहिती,

प्रसिद्ध करील ;

(ग) जे निर्णय आणि धोरणे घोषित केल्यावर त्याचा जनतेवर परिणाम होतो अशा महत्त्वाच्या प्रशासकीय किंवा न्यायिकवत निर्णयाशी आणि धोरणांशी संबंधित सर्व प्रस्तुत वस्तुस्थिती प्रसिद्ध करील ;

(घ) कोणताही प्रकल्प सुरू करण्यापूर्वी, जनतेला सर्वसाधारणपणे आणि खास करून प्रकल्पबाधित व्यक्तींना, त्याच्याकडे उपलब्ध असलेली किंवा त्याला सहज प्राप्त असलेली आणि त्या बाधित व्यक्तींना त्यांच्या मते जी कळणे आवश्यक असेल अशी माहिती प्रसिद्ध करील किंवा कळवील.

शासकीय माहिती अधिकाऱ्यांची नियुक्ती. ५. (१) प्रत्येक सक्षम प्राधिकारी, या अधिनियमाच्या प्रयोजनासाठी, अशा प्राधिकाऱ्याच्या नियंत्रणाखालील सर्व प्रशासकीय युनिटे आणि कार्यालये यांमध्ये शासकीय माहिती अधिकारी म्हणून एका किंवा अधिक अधिकाऱ्यांना पदनिर्देशित करील.

(२) प्रत्येक शासकीय माहिती अधिकारी, माहितीसाठी केलेल्या विनंतीबाबत कार्यवाही करील आणि अशी माहिती मागणाऱ्या व्यक्तीस वाजवी सहाय्य करील.

(३) शासकीय माहिती अधिकाऱ्यास, त्याची कर्तव्ये उचितपणे बजावण्यासाठी त्यास आवश्यक वाटेल अशा इतर अधिकाऱ्याचे किंवा कर्मचाऱ्याचे सहाय्य घेता येईल.

(४) पोट-कलम (३) अन्वये ज्या कोणत्याही अधिकाऱ्याचे किंवा कर्मचाऱ्याचे सहाय्य मागितले असेल तो, त्याचे सहाय्य मागणाऱ्या शासकीय माहिती अधिकाऱ्यास सर्वतोपरी सहाय्य करील.

६. (१) माहिती मिळवण्याची इच्छा असलेली व्यक्ती विहित रीतीने आणि विहित करण्यात येईल अशा शुल्कासह, अशा नमुन्यात आणि अशा तपशीलासह, शासकीय माहिती अधिकाऱ्याकडे अर्ज करील. माहिती मिळविण्याची कार्यपद्धती.

(२) पोट-कलम (१) अन्वये माहिती मिळण्याची विनंती करणारा अर्ज मिळाल्यानंतर, शासकीय माहिती अधिकारी, शक्य तितक्या शीघ्रतेने आणि कोणत्याही परिस्थितीत, तो अर्ज मिळाल्याच्या दिनांकापासून पंधरा कामाच्या दिवसांपेक्षा अधिक नसेल एवढ्या कालावधीत, एकतर मागितलेली माहिती पुरवील किंवा या अधिनियमाच्या तरतुदींन्वये विनिर्दिष्ट केलेल्या कोणत्याही कारणांकरिता तो माहितीची मागणी फेटाळील :

परंतु, योग्य प्रकरणामध्ये, ही कालमर्यादा, कारणे नमूद करून आणि अर्जदाराला ती कळवून, आणखी पंधरा कामाच्या दिवसांनी वाढविता येईल :

परंतु आणखी असे की, आवश्यक ती माहिती देण्यासाठीचे मूल्य दर्शविणाऱ्या, विहित फी व्यतिरिक्त कोणत्याही अतिरिक्त फीचे प्रदान केल्यावर एखादी माहिती देण्याचे ठरविण्यात आले असेल त्या बाबतीत, शासकीय माहिती अधिकारी, त्याने निश्चित केलेल्या अतिरिक्त फीचा तपशील देणारी सूचना अर्जदारास पाठवील व अर्जदाराने ती अतिरिक्त फी जमा करावी अशी त्यास विनंती करील आणि उक्त सूचना त्याला पाठवण्यात आल्यापासून ते अशा अतिरिक्त फीचे प्रदान होईपर्यंतचा दरम्यानचा काही कालावधी असल्यास तो, या पोट-कलमामध्ये निर्दिष्ट केलेला पंधरा कामाच्या दिवसांचा कालावधी किंवा, यथास्थिति, जादा पंधरा दिवसांचा कालावधी, मोजण्याच्या प्रयोजनार्थ वगळण्यात येईल :

परंतु तसेच, विहित फी, किंवा यथास्थिति, देय असलेली अतिरिक्त फी ही, माहिती पुरविण्याच्या प्रत्यक्ष खर्चापेक्षा अधिक असणार नाही.

(३) पोट-कलम (२) अन्वये जेव्हा एखादी मागणी फेटाळण्यात येईल तेव्हा त्या बाबतीत, शासकीय माहिती अधिकारी, मागणी करणाऱ्या व्यक्तीस,—

(एक) मागणी फेटाळण्यामागील कारणे ;

(दोन) मागणी फेटाळण्याविरुद्ध ज्या कालावधीत अपील दाखल करता येईल, तो कालावधी ; आणि

(तीन) ज्याच्याकडे अर्जदाराने अपील दाखल करावयाचे तो अधिकारी किंवा प्राधिकारी, या गोष्टी लेखी कळवील.

(४) शासकीय प्राधिकरणाने ज्या भाषेमध्ये व ज्या नमुन्यामध्ये माहिती ठेवली असेल, त्या भाषेमध्ये व त्या नमुन्यामध्ये माहिती देण्यात येईल.

(५) जेव्हा जेव्हा व जेथे जेथे, मागणी केलेली माहिती ही, एखाद्या व्यक्तीचे जीवन व स्वातंत्र्य यांच्याशी संबंधित असेल तेव्हा तेव्हा व तेथे तेथे, ती माहिती, कलम ७ च्या तरतुदींना अधीन राहून, अर्ज मिळाल्यापासून चोवीस तासांच्या आत त्या अर्जदारास पुरविण्यात येईल.

७. या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, कोणत्याही व्यक्तीस,— माहिती उघड करण्यातून सूट.

(क) जो माहिती उघड करण्याने भारताचे सार्वभौमत्व व एकात्मता, राज्याची सुरक्षितता किंवा हित, विदेशी राज्याशी असलेले संबंध यांवर बाधकरित्या परिणामक होईल किंवा एखाद्या अपराधास चिथावणी मिळेल, अशी माहिती देण्यात येणार नाही :

परंतु, जेव्हा जेव्हा मागितलेली कोणतीही माहिती वर नमूद केलेल्या कारणांसाठी रोखून ठेवावयाची असेल तेव्हा तेव्हा, अशा माहितीसाठी करण्यात आलेली विनंती, शासकीय माहिती अधिकारी, सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत ताबडतोब समितीपुढे विचारार्थ आणि निर्णयार्थ मांडील :

परंतु, आणखी असे की, शासकीय माहिती अधिकारी, ती विनंती नाकारण्यासाठी अशा समितीकडून मान्यता मिळवल्यावर, असा नकार अर्जदाराला कळविताना, समितीच्या मान्यतेने असा नकार देण्यात आला आहे, हे नमूद करील ;

(ख) जी माहिती प्रसिद्ध करण्यास कोणत्याही न्यायालयाकडून किंवा न्यायाधिकरणाकडून स्पष्टपणे मनाई करण्यात आली असेल किंवा जी उघड करण्याने न्यायालयाचा अवमान होत असेल, अशी माहिती देण्यात येणार नाही ;

(ग) जी माहिती उघड करण्याने, संसदेच्या अथवा राज्य विधानमंडळाच्या विशेषाधिकारांचा भंग होत असेल, अशी माहिती देण्यात येणार नाही ;

(घ) वाणिज्य क्षेत्रातील विश्वास, व्यापारविषयक गुपिते किंवा बौद्धिक संपदा यांसारखी जी माहिती, उघड करण्याने त्रयस्थ पक्षाच्या स्पर्धात्मक स्थानाला हानी पोहोचेल ती माहिती उघड केल्याने अधिकाधिक लोकहिताची हमी मिळेल, अशी सक्षम प्राधिकाऱ्याची खात्री पटलेली असल्याखेरीज, अशी माहिती देण्यात येणार नाही ;

(ङ) एखाद्या व्यक्तीच्या विश्वासाश्रित संबंधामुळे त्याला उपलब्ध झालेली माहिती--जी माहिती उघड केल्याने अधिकाधिक लोकहिताची हमी मिळेल, अशी सक्षम प्राधिकाऱ्याची खात्री पटलेली असल्याखेरीज—देण्यात येणार नाही ;

(च) एखाद्या व्यक्तीच्या सेवा अभिलेखाशी संबंधित असलेली माहिती देण्यात येणार नाही ;

(छ) विदेशी सरकार किंवा आंतरराष्ट्रीय संघटना यांच्याकडून गुप्तपणे मिळालेली माहिती देण्यात येणार नाही ;

(ज) जी माहिती उघड करण्याने, कोणत्याही व्यक्तीचे जीवन किंवा शारीरिक सुरक्षितता धोक्यात येईल अथवा कायद्याची अंमलबजावणी करण्यासाठी किंवा सुरक्षिततेच्या प्रयोजनांसाठी गुप्तपणे दिलेल्या माहितीचे सूत्र किंवा केलेले सहाय्य ओळखता येईल, अशी माहिती देण्यात येणार नाही ;

(झ) शासकीय गुपिते अधिनियम, १९२३ च्या तरतुदीन्वये जी उघड करण्यास मनाई केली आहे, अशी माहिती देण्यात येणार नाही ; १९२३ चा १९.

(ञ) ज्यामुळे गुन्हेगारांचे अन्वेषण करणे किंवा त्यांना अटक करणे किंवा त्यांच्यावर खटला दाखल करणे यामध्ये अडथळा येईल, अशी माहिती देण्यात येणार नाही ; आणि

(ट) जी माहिती उघड करण्याचा कोणत्याही सार्वजनिक कामकाजाशी किंवा हितसंबंधाशी कोणताही संबंध नसेल किंवा जी उघड केल्याने व्यक्तीच्या खाजगीपणाचे विनाकारण उल्लंघन होईल अशी वैयक्तिक माहितीशी संबंधित असलेली माहिती, व्यापक लोकहिताच्या दृष्टीने ती उघड करणे आवश्यक आहे, अशी सक्षम प्राधिकाऱ्याची खात्री पटलेली असल्याखेरीज देण्यात येणार नाही.

विवक्षित प्रकरणांमध्ये माहिती देण्यास नकार देण्याची कारणे.

८. कलम ७ च्या तरतुदींना बाध न येता, शासकीय माहिती अधिकाऱ्यास पुढील बाबतीत माहिती पुरविण्याच्या विनंतीस, नकार देता येईल :—

(क) जेव्हा माहिती ही आधीच **राजपत्रात** किंवा अन्यत्र प्रसिद्ध झालेली असून ती जनतेला उपलब्ध आहे किंवा ती अशा स्वरूपाची आहे की परत मिळविणे किंवा संस्करण करणे आवश्यक असलेल्या त्या मोठ्या प्रमाणातील माहितीसाठी शासकीय प्राधिकरणाच्या साधनसामग्रीचा प्रमाणाबाहेर वापर करावा लागेल :

परंतु, उपरोक्त कारणावरून जेव्हा अशी विनंती नाकारली असेल तेव्हा, माहिती मागणाऱ्या व्यक्तीला, ज्यायोगे माहितीचा पुरवठा करणे सुकर होईल अशा रीतीने ती विनंती पुन्हा सादर करण्यास शक्य होईल तितकी मदत करणे हे शासकीय माहिती अधिकाऱ्याचे कर्तव्य असेल ;

(ख) जेव्हा ती माहिती अशा माहितीशी संबंधित असेल की, जी कायदा, नियम, विनियम किंवा आदेश यांद्वारे विशिष्ट वेळी प्रसिद्ध करणे आवश्यक असेल.

९. (१) कलम ७ च्या तरतुदींना बाध न येता,— इतर माहिती.

(क) एखाद्या प्रकरणात निर्णय प्रक्रियेशी संबंधित असलेली माहिती, कोणत्याही अर्जदारास, अशा प्रकरणी निर्णय घेण्यात आल्यानंतर किंवा निर्णय घेतला असल्याचे मानण्यात आल्यानंतर आणि ते प्रकरण पूर्ण झाल्यावर किंवा समाप्त झाल्यावर, उपलब्ध करून देण्यात येईल ;

(ख) कलम ६ च्या पोट-कलम (१) खाली केलेल्या कोणत्याही विनंतीच्या दिनांकापूर्वीच्या पंधरा वर्षांपूर्वी झाली असेल, उद्भवली असेल, घडली असेल अशी कोणतीही घटना, प्रसंग किंवा बाब या संबंधातील कोणतीही माहिती अशी विनंती करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीस पुरविण्यात येईल.

(२) संसदेपासून किंवा राज्य विधानमंडळापासून जी रोखून ठेवता येत नसेल अशी कोणतीही माहिती, या अधिनियमाच्या तरतुदींखाली अर्जदारास अवश्य उपलब्ध करून दिली जाईल.

१०. ज्या माहितीसाठी एखादी विनंती करण्यात आली असेल ती माहिती, जर या अधिनियमान्वये उघड करण्यापासून सूट दिली आहे अशा माहितीचा समावेश नसलेल्या अभिलेखाच्या भागामधून देणे शक्य असेल किंवा ती माहिती जर, सूट दिलेल्या माहितीचा समावेश असलेल्या अभिलेखाच्या कोणत्याही भागापासून वाजवी रीत्या पृथक करता येण्याजोगी असेल तर, ती माहिती उघड करण्यापासून सूट दिलेल्या एखाद्या माहितीशी किंवा अभिलेखाशी संबंधित आहे, या कारणावरून ती विनंती पूर्णपणे नाकारता येणार नाही. पृथक्करण योग्यता.

११. (१) (एक) शासकीय माहिती अधिकाऱ्याच्या आदेशामुळे व्यथित झालेल्या कोणत्याही व्यक्तीस, असा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत ; किंवा अपिले.

(दोन) ज्या व्यक्तीला, कलम ६ च्या पोट-कलम (२) मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे असा अर्ज केल्याच्या दिनांकापासून, पंधरा कामाच्या दिवसांच्या कालावधीच्या आत किंवा उक्त पोट-कलम (२) च्या दुसऱ्या परंतुकामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे वाढीव कालावधीच्या आत, काही कळविण्यात आले नसेल अशा कोणत्याही व्यक्तीस,

असा कालावधी व्यपगत झाल्यापासून, तीस दिवसांच्या कालावधीच्या आत, विहित करण्यात येईल अशा नमुन्यात व अशा फीसह अपील प्राधिकरणाकडे अपील करता येईल :

परंतु, जेव्हा कलम ७ च्या खंड (क) अन्वये शासकीय माहिती अधिकारी उक्त खंड (क) च्या परंतुकामध्ये निर्देशिलेल्या समितीच्या मान्यतेने, आदेश काढील, तेव्हा, अशा आदेशा-विरुद्धचे अपील फक्त लोकायुक्ताकडे किंवा उप लोकायुक्तांकडेच दाखल केले जाईल.

(२) अपील प्राधिकरणास, बाधित झालेल्या व्यक्तीस किंवा व्यक्तींना आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, त्यास योग्य वाटेल असा आदेश देता येईल.

(३) अपील प्राधिकरणाच्या पोट-कलम (२) खालील आदेशामुळे व्यथित झालेल्या कोणत्याही व्यक्तीस, असा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, राज्याच्या लोकायुक्ताकडे, किंवा यथास्थिति, उप लोकायुक्ताकडे, दुसरे अपील दाखल करता येईल.

(४) पोट-कलमे (१) आणि (३) मध्ये निर्देशिलेली अपिले, अशी अपिले मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत किंवा तीस दिवसांपेक्षा आणखी अधिक होणार नाही अशा वाढविलेल्या कालावधीच्या आत, कालावधी अशाप्रकारे वाढविल्याची कारणे नमूद करून, शक्यतोवर निकालात काढण्यात येतील.

(५) लोकायुक्त किंवा, यथास्थिति, उप लोकायुक्तांचा अपिलांवरील निर्णय अंतिम असेल.

शास्ती. **१२.** (१) जेव्हा कोणत्याही शासकीय माहिती अधिकाऱ्याने कलम ६ च्या पोट-कलम (२) अन्वये विनिर्दिष्ट केलेल्या कालावधीच्या आत, मागितलेली माहिती देण्यात कोणत्याही योग्य कारणाशिवाय कसूर केली असेल तेव्हा, अपील प्राधिकरणास अशा अपिलामध्ये, शासकीय माहिती अधिकाऱ्याला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, माहिती देण्यास विलंब केल्याच्या प्रत्येक दिवसाकरिता दोनशे पन्नास रुपये एवढ्या रकमेची शास्ती लादता येईल.

(२) कोणत्याही शासकीय माहिती अधिकाऱ्याने, जाणूनबुजून,—

(क) चुकीची किंवा दिशाभूल करणारी माहिती, किंवा

(ख) सदोष किंवा अपूर्ण माहिती,

दिली असल्याचे अपिलामध्ये आढळून आले असेल तेथे, अपील प्राधिकरणास, शासकीय माहिती अधिकाऱ्याला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, त्याला योग्य वाटेल त्यानुसार, अशा अधिकाऱ्यावर दोन हजार रुपयांपेक्षा अधिक नसेल एवढी शास्ती लादता येईल.

(३) अपील प्राधिकरणाच्या आदेशाविरुद्ध, लोकायुक्त किंवा उप लोकायुक्त यांच्याकडे अपील करता येईल आणि कलम ११ ची पोट-कलमे (३), (४) व (५) यांच्या तरतुदी, अशा अपिलास, योग्य त्या फेरफारांसह, लागू होतील.

(४) अपील प्राधिकरणाने, पोट-कलमे (१) व (२) यांअन्वये लादलेली शास्ती, संबंधित शासकीय माहिती अधिकाऱ्याच्या वेतनातून वसुलीयोग्य असेल, किंवा वेतन काढण्यात येत नसेल तर ती, जमीन महसुलाच्या थकबाकीप्रमाणे वसुलीयोग्य असेल.

(५) ज्या शासकीय अधिकाऱ्यावर, पोट-कलमे (१) व (२) यांअन्वये शास्ती लादलेली आहे अशा अधिकाऱ्यावर, त्याला लागू असलेल्या सेवेच्या नियमांन्वये योग्य ती शिस्तभंगाची कारवाई केली जाण्यास देखील तो पात्र असेल.

परिषदा घटित करणे. **१३.** (१) शासन, या अधिनियमाच्या कामकाजाचे संनियंत्रण करण्यासाठी राज्य स्तरावर मुख्य सचिवाच्या किंवा कोणत्याही अपर मुख्य सचिवाच्या अध्यक्षतेखाली, आणि प्रत्येक महसुली विभागासाठी संबंधित विभागीय आयुक्ताच्या अध्यक्षतेखाली, एक परिषद स्थापन करील. अशा परिषदेमध्ये सर्वसाधारणपणे, विहित करण्यात येतील त्याप्रमाणे समाजातील नामवंत व प्रतिष्ठित व्यक्ती आणि प्रसारमाध्यमे व अशासकीय संघटना यांचे प्रतिनिधी व शिक्षण तज्ज्ञ, यांचा समावेश असेल.

(२) परिषद, सहा महिन्यांतून किमान एकदा अधिनियमाच्या कामाचा आढावा घेईल आणि शासनाला यथोचित शिफारशी करील.

अभिलेख आयोग घटित करणे. **१४.** (१) शासन, शासनाचे प्रतिनिधी, विहित करण्यात येतील अशा समाजातील नामवंत व प्रतिष्ठित व्यक्ती आणि शिक्षण तज्ज्ञ यांचा मिळून बनलेला अभिलेख आयोग स्थापन करील. जुने अभिलेख, जनतेच्या माहितीकरिता उपलब्ध करून देण्यासाठी खुले करण्याबाबत शासनाला सल्ला देणे, हे अभिलेख आयोगाचे कर्तव्य असेल.

(२) अभिलेख आयोगाचा निर्णय शासनावर बंधनकारक असेल आणि शासनाने कारणे नमूद करून आयोगाचा निर्णय अमान्य करण्याचे ठरवलेले नसल्यास, तीन महिन्यांच्या आत त्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यात येईल.

(३) अभिलेख आयोगाचा निर्णय अमान्य करण्यात आल्याच्या प्रत्येक प्रकरणी, शासन राज्य विधानमंडळाला लवकरात लवकर तसे निवेदन सादर करील.

१५. या अधिनियमाच्या किंवा त्याखाली केलेल्या नियमांच्या तरतुदींनुसार सद्‌भावनेने केलेल्या किंवा करण्याचे अभिप्रेत असलेल्या कोणत्याही गोष्टीसाठी, कोणताही शासकीय कर्मचारी किंवा अधिकारी यांच्याविरुद्ध कोणताही दावा, खटला किंवा इतर कायदेशीर कार्यवाही दाखल करण्यात येणार नाही. सद्‌भावनेने केलेल्या कृतीला संरक्षण.

१६. कोणतेही न्यायालय, या अधिनियमान्वये दिलेल्या कोणत्याही आदेशाच्या संबंधातील कोणताही दावा, अर्ज किंवा अन्य कार्यवाही दाखल करून घेणार नाही आणि या अधिनियमान्वये करण्यात येणारे अपील वगळता, अशा आदेशास आव्हान देता येणार नाही. न्यायालयांच्या अधिकारितेस रोध.

१७. राज्य विधानमंडळाने तयार केलेल्या कोणत्याही अन्य कायद्यात किंवा त्याखाली केलेल्या कोणत्याही नियमांत, विनियमांत किंवा आदेशात या अधिनियमाच्या तरतुदींशी विसंगत असे काहीही असले तरी, या तरतुदी परिणामक्षम असतील. अधिनियमाचा अधिभावी परिणाम असणे.

१८. (१) या अधिनियमाची प्रयोजने पार पाडण्यासाठी, राज्य शासनास, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, नियम करता येतील. नियम करण्याचा अधिकार.

(२) प्रथमच तयार करण्यात आलेल्या नियमांखेरीज, या अधिनियमान्वये तयार केलेले सर्व नियम, पूर्व प्रसिद्धीच्या शर्तीस अधीन असतील.

(३) या अधिनियमान्वये करण्यात आलेला प्रत्येक नियम, तो करण्यात आल्यानंतर शक्य तितक्या लवकर, राज्य विधानमंडळाचे अधिवेशन चालू असताना, एकाच अधिवेशनात किंवा लागोपाठच्या दोन किंवा त्याहून अधिक अधिवेशनांत, मिळून एकूण तीस दिवसांची होईल इतक्या मुदतीकरिता, राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहापुढे ठेवण्यात येईल आणि ज्यामध्ये अशा प्रकारे तो ठेवण्यात येईल ते अधिवेशन किंवा त्या अधिवेशनाच्या लगतनंतरचे अधिवेशन, समाप्त होण्यापूर्वी, त्या नियमात कोणताही फेरबदल करण्यास दोन्ही सभागृहे कबूल होतील किंवा तो नियम करण्यात येऊ नये याबाबत दोन्ही सभागृहांचे एकमत होईल आणि तशा अर्थाचा त्यांचा निर्णय ते **राजपत्रात** अधिसूचित करतील तर, असा निर्णय **राजपत्रात** प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून तो नियम अशा फेरबदल केलेल्या स्वरूपातच अंमलात येईल, किंवा यथास्थिति, मुळीच अंमलात येणार नाही ; तथापि, असा कोणताही फेरबदल किंवा विलोपन यामुळे त्या नियमान्वये पूर्वी करण्यात आलेल्या किंवा करण्याचे वर्जिलेल्या कोणत्याही गोष्टींच्या विधिग्राह्यतेस बाध येणार नाही.

१९. (१) या अधिनियमाच्या तरतुदींची अंमलबजावणी करताना कोणतीही अडचण उद्‌भवल्यास, शासनास, प्रसंगानुरूप अडचण दूर करण्याच्या प्रयोजनासाठी त्यास आवश्यक व इष्ट वाटेल अशी, या अधिनियमाच्या तरतुदींशी विसंगत नसलेली कोणतीही गोष्ट, **राजपत्रात** प्रसिद्ध केलेल्या आदेशाद्वारे करता येईल : अडचणी दूर करण्याचा अधिकार.

परंतु, या अधिनियमाच्या प्रारंभाच्या दिनांकापासून दोन वर्षांचा कालावधी समाप्त झाल्यावर असा कोणताही आदेश काढता येणार नाही.

(२) या कलमान्वये काढण्यात आलेला प्रत्येक आदेश, तो काढण्यात आल्यानंतर, शक्य तितक्या लवकर, राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहापुढे ठेवण्यात येईल.

सन २००० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३८ याचे निरसन.

**२०.** महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००० हा याद्वारे निरसित करण्यात येत आहे. २००० चा महा. ३८.

सन २००० चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १० याचे निरसन व व्यावृत्ती.

**२१.** (१) महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२ हा याद्वारे निरसित करण्यात येत आहे. २००० चा महा. अध्या. १०.

(२) अशा प्रकारे निरसन झाले असले तरीही, उक्त अध्यादेशान्वये करण्यात आलेली कोणतीही गोष्ट किंवा कारवाई ही (काढण्यात आलेली कोणतीही अधिसूचना किंवा आदेश यांसह) या अधिनियमान्वये करण्यात आलेली गोष्ट, कार्यवाही किंवा यथास्थिती, काढण्यात आलेली अधिसूचना किंवा आदेश असल्याचे मानण्यात येईल.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई

असा. क्र. ७२

रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

**प्राधिकृत प्रकाशन**

सोमवार, ऑगस्ट ११, २००३/श्रावण २०, शके १९२५

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग आठ

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Maharashtra Right to Information Act, 2002 (Mah. Act No. XXXI of 2003), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

PRATIMA UMARJI,
Principal Secretary to Government,
Law and Judiciary Department.

---

## MAHARASHTRA ACT No. XXXI OF 2003.

(First published, after having received the assent of the President in the "*Maharashtra Government Gazette*", on the 11th August 2003.)

An Act to make provision for effectively securing and enforcing the right to information in the State of Maharashtra and for matters connected therewith or incidental thereto.

WHEREAS the right to information has been recognized by the Supreme Court as a part of the fundamental right guaranteed to the citizens under Article 19(*1*) of the Constitution of India;

AND WHEREAS the right to information is the bed-rock of democracy and can pave the way for transparency, openness and accountability in governance of the affairs of the State and ensure effective participation of the people in a democratic society;

AND WHEREAS is is expedient to make provision for effectively securing and enforcing the right to information in the State of Maharashtra and for matters connected therewith or incidental thereto;

AND WHEREAS both Houses of the State Legislature were not in session;

AND WHEREAS Shri Chunilal Karsandas Thakker, discharging the functions of the Governor of Maharashtra, was satisfied that circumstances existed which rendered it necessary for him to take immediate action to make a law for the purposes hereinafter appearing; and, therefore, promulgated the Maharashtra Right to Information Ordinance, 2002, on the 23rd September 2002; Mah. Ord. X of 2002.

AND WHEREAS it is expedient to replace the said Ordinance by an Act of the State Legislature; it is hereby enacted in the Fifty-third Year of the Republic of India as follows:—

Short title, extent and commencement

**1.** (*1*) This Act may be called the Maharashtra Right to Information Act, 2002.

(*2*) It shall extend to the whole of the State of Maharashtra.

(*3*) It shall be deemed to have come into force on the 23rd September 2002.

Definitions.

**2.** In this Act, unless the context otherwise requires,—

(*1*) " appellate authority " means the concerned Competent Authority mentioned in clause (3) and shall also include such officer or officers authorised by the concerned Competent Authority to act as the Appellate Authority, by general or special order, for the purposes of this Act;

(*2*) " Committee " means the Committee constituted by the Government for the purposes of section 7(*a*), under the Chairmanship of the Additional Chief Secretary (Home) to the Government and other two members as may be specified by the Government by an order issued in this behalf;

(*3*) " Competent Authority " means,—

(*i*) the Head of every Administrative Department of the State Government;

(*ii*) the Administrative Heads of the public and other authorities in the State;

(*iii*) the Registrar of Co-operative Societies for the Co-operative Societies registered under the Maharashtra Co-operative Societies Act, 1960; Mah. XXIV of 1961.

(*iv*) the Registrar of Societies for the Societies registered under the Societies Registration Act, 1860; 21 of 1860.

Bom. XXIX of 1950. (*v*) the Charity Commissioner for Charity Commissioner's Office and the Public Trusts registered under the Bombay Public Trusts Act, 1950 ;

(*vi*) the Commissioner of Labour for the trade unions registered with him ;

(*vii*) the Secretary of the Maharashtra Public Service Commission for the administrative wing of the Maharashtra Public Service Commission ;

(*viii*) the Registrar of the Lokayukta and Upa-Lokayuktas for the administrative wing of the Office of Lokayukta and Upa-Lokayuktas ;

(4) " Government " means the Government of Maharashtra ;

(5) "Imformation" means information relating to any matter in respect of the affairs of the Government and of any public authority and includes a copy of any record in the form of a document, diskettes, floppy or any other electronic mode ;

(6) " public authority " means any authority or body established or constituted by any Central or State law and includes any other body owned and controlled by the State or which receives any aid directly or indirectly by the Government and shall include the bodies whose composition and administration are predominantly controlled by the Government or the functions of such body are of public nature or interest or on which office bearers are appointed by the Government.

*Explanation.*—For the purposes of this clause the expression "aid" shall include Government aid in the form of Government land at concessional rates or any other monetory concessions like exemption from tax, etc., by Government as specified by Government, from time to time ;

(7) " Public Information Officer " means an Officer designated by any Competent Authority under sub-section (*1*) of section 5 and shall include such Officer or Employee whose assistance has been taken by the Public Information Officer for the performance of his duties under this Act ;

(8) " prescribed" means prescribed by rules made under this Act ;

(9) "record" means and includes,—

(*i*) any document, manuscript or file ;

(*ii*) any microfilm, microfiche and fascimile copy of a document ;

(*iii*) any reproduction of image or images embodied in such microfilm (whether enlarged or not) ; and

(*iv*) any other material produced by a computer or by any other device ;

(10) "State" means the State or Maharashtra.

Right to information.

3. Subject to the provisions of this Act, every citizen shall have the right to get information.

Obligation on public authorities.

4. Every Competent Authority shall,—

(*a*) maintain all its records, in such manner and form, as is consistent with its operational requirements duly catalogued and indexed ;

(*b*) publish in the manner prescribed, from time to time,—

(*i*) the particulars of its organization, functions and duties ;

(*ii*) the powers and duties of its officers and employees and the procedure to be followed by them in decision making process ;

(*iii*) the norms set by the public authority for the discharge of its functions ;

(*iv*) the rules, regulations, instructions, manuals, government resolutions, orders and guidelines and the list of record in the office, which can be made available to the citizens ;

(*v*) the details of facilities available to citizens for obtaining information ;

(*vi*) the name, designation and other particulars of the Public Information Officer ; and

(*vii*) such additional information as may be prescribed by the Competent Authority concerned, from time to time ;

(*c*) publish all relavant facts concerning important decisions whether administrative or quasi-judicial and policies that affect the public while announcing such decisions and policies ;

(*d*) before initiating any project, publish or communicate to the public generally and to the persons affected by the project in particular, the facts available to it or to which it has reasonable access and which in its opinion should be known to the affected persons.

Appointment of Public Information Officers.

5. (*1*) Every Competent Authority shall for the purposes of this Act, designate one or more officers as Public Information Officers in all administrative units and offices under such authority.

(*2*) Every Public Information Officer shall deal with a request for information and shall render reasonable assistance to any person seeking such information.

(*3*) The Public Information Officer may seek the assistance of any other Officer or Employee as he considers necessary for the proper discharge of his duties.

(*4*) Any Officer or Employee whose assistance has been sought under sub-section (*3*), shall render all assistance to the Public Information Officer seeking his assistance.

**6.** (*1*) A person desirous of obtaining information shall make an application to the Public Information Officer in the prescribed manner along with such fees, in such form and with such particulars, as may be prescribed.

Procedure of getting inofrmation.

(*2*) On receipt of an application requesting for information under sub-section (*1*), the Public Information Officer shall, as expeditiously as possible and in any case, not later than fifteen working days from the date of receipt of the application, either provide the information as requested or reject the request for any of the reasons specified under the provisions Act :

Provided that, in a suitable case for the reasons to be recorded and communicated to the applicant, the time limit may be extended by another fifteen working days :

Provided further that, where it is decided to provide the information on payment of any additional fees than the fees prescribed representing the cost of providing the necessary information, the Public Information Officer shall send an intimation to the applicant giving the details of the additional fees determined by him, requesting him to deposit the additional fees, and the period intervening the dispatch of the said intimation and payment of such additional fees, if any, shall be excluded for the purpose of calculating the period of fifteen working days or the additional period of fifteen days, as the case may be, referred to in this sub-section :

Provided also that, the fees prescribed or the additional fees payable, as the case may be, shall not exceed the actual cost of supplying the information.

(*3*) Where a request is rejected under sub-section (*2*), the Public Information Officer shall communicate in writing to the person making the request,—

(*i*) the reasons for such rejection ;

(*ii*) the period within which an appeal, against such rejection may be preferred ; and

(*iii*) the officer or authority before whom the appeal shall be preferred by the applicant.

(*4*) The information shall be provided in the language and in the form in which it is maintained by the public authority.

(*5*) Whenever and wherever the information applied for, involves the life and liberty of a person, such information shall, subject to the provisions of section 7, be supplied to the applicant within twenty-four hours of the receipt of the application.

**7.** Notwithstanding anything contained in this Act, no person shall be given the,—

Exemption from disclosure of information.

(*a*) information, disclosure of which would prejudicially affect the sovereignty and integrity of India, the security or interests of the State, relation with foreign State or lead to incitement of an offence :

Provided that, whenever any information sought is to be withheld on the aforementioned grounds, the request for such information shall forthwith be put up by the Public Information Officer through the Competent Authority to the Committee for consideration and decision :

Provided further that, the Public Information Officer shall, after obtaining the approval from such Committee for rejection of the request, while communicating such rejection to the applicant mention that such rejection is with the approval of the Committee ;

(*b*) information which has been expressly forbidden to be published by any court of law or tribunal or the disclosure of which may constitute contempt of court ;

(*c*) information, the disclosure of which would cause a breach of privilege of Parliament or the State Legislature ;

(*d*) information including commercial confidence, trade secrets or intellectual property, the disclosure of which would harm the competitive position of a third party, unless the Competent Authority is satisfied that larger public interest warrants the disclosure of such information ;

(*e*) information available to a person in his fiduciary relationship, unless the Competent Authority is satisfied that the larger public interest warrants the disclosure of such information ;

(*f*) information pertaining to service record of a person ;

(*g*) information received in confidence from foreign government or International Organization ;

(*h*) information the disclosure of which would endanger the life or physical safety of any person or identify the source of information or assistance given in confidence for law enforcement or security purposes ;

(*i*) information, the disclosure of which is prohibited under the provisions of the Official Secrets Act, 1923 ; 19 of 1923.

(*j*) information which would inpede the process of invistigation or apprehension or prosecution of offenders ; and

(*k*) information which relates to personal information the disclosure of which has no relationship to any public activity or interest, or which would cause unwarranted invasion of the privacy of the individual unless the Competent Authority is satisfied that the larger public interest justifies the disclosure of such information.

Grounds for refusal to supply of information in certain cases.

**8.** Without prejudice to the provisions of section 7, the Public Information Officer may also reject the request for supply of information where,—

(*a*) the information is already published in the *Official Gazette* or otherwise, and is available to public or is of such a nature.

